श्री. एस. एस. मिश्रा, भा.व.से. (सेवानिवृत्त) यांचा निलंबन कालावधी नियमित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. आयएफएस १०१७/ प्रक्र ८० /आस्था-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २ मे,२०१७

<u>वाचा</u> - १) शासन आदेश क्र. आयएफओ १०९४/ प्र.क्र. २४२/ फ-७ (भाग दोन ) दि. ३० जुलै,१९९४
२) शासन आदेश क्र. आयएफएस ११९५/प्र.क्र.११९/ फ-७, दि. ५.९.१९९५
३) शासन आदेश क्र. एएफओ ११०३/ ११०५/ प्र.क्र.१२५/फ-७, दि. २२.९.२००३
४) शासन आदेश क्र.आयएफएस/१३९४/सीआर३७१(भाग २)/फ-७,दि. ३.४.२०१२

**आदेश :-**

श्री एस.एस.मिश्रा, भा.व.से. (सेवानिवृत्त ) हे राज्य शासनाच्या सेवेत कार्यरत असताना अंबाझरी वन येथे वनीकरण कामकाजामध्ये झालेल्या अनियमिततेच्या अनुषंगाने अखिल भारतीय सेवा (शिस्त व अपील) नियम १९६९ च्या नियम ३ अन्वये संदर्भ क्र. १ च्या शासन आदेशान्वये श्री मिश्रा यांना शासन सेवेतून प्रत्यक्षात दि. ३.८.१९९४ पासून निलंबित करण्यात आले होते.

२. सदर प्रकरणातील अन्य अपचारी अधिकारी श्री व्ही.आर.सिंग, भावसे तत्कालीन उपवनसंरक्षक, नागपूर वन विभाग नागपूर यांनी निलंबन आदेशाच्या अनुषंगाने मा. केंद्रीय प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई येथे मुळ अर्ज क्र. १०४७/१९९४ दाखल केला होता. सदर प्रकरणी मा. केंद्रीय प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दिलेल्या आदेशानुसार संदर्भ क्र. २ येथील शासन आदेशान्वये श्री मिश्रा, यांना तात्काळ प्रभावाने शासन सेवेमध्ये पुनर्स्थापित करण्यात आले. श्री मिश्रा यांच्या पदस्थापनेचे आदेश प्रशासकीय कारणास्तव विलंबाने निघाल्याने श्री मिश्रा दि. ५.१२.१९९५ (म.पू.) रोजी पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू झाले. दिनांक ६.९.१९९५ ते दि. ४.१२.१९९५ पर्यंतचा कालावधी संदर्भ क्र. ३ येथील शासन आदेश दि.२२.९.२००३ अन्वये सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी म्हणून नियमित करण्यात आला आहे. सबब श्री मिश्रा यांचा प्रत्यक्ष निलंबन कालावधी दि. ३.८.१९९४ ते दि. ५.९.१९९५ असा ठरतो.

३. सदर प्रकरणी श्री मिश्रा यांच्या विरुध्द अखिल भारतीय सेवा (शिस्त व अपील) नियम १९६९ च्या नियम ८ अन्वये शिस्तभंगाची कारवाई सुरु करण्यात आली होती. तसेच सदर प्रकरणी पोलीस ठाणे अंबाझरी, नागपूर शहर येथे दि. २.४.१९९८ रोजी अप.क्र. ३०२५/१९९८ व अप.क्र.३०२६/१९९८ असे दोन स्वतंत्र गुन्हे दाखल करण्यात आले होते. त्यापैकी अप.क्र. ३०२५/१९९८ प्रकरणी मा. विशेष न्यायालय (ला.प्र.का.) नागपूर यांच्या न्यायालयामध्ये तपासी अधिकारी यांनी दाखल केलेली “अ” समरी क्रमांक ३/०९ मा. न्यायालयाकडून दि. २६.६.२००९ रोजी मंजूर करण्यात येवून सदर प्रकरण निकाली काढण्यात आले. आता श्री.मिश्रा यांना अन्य अप.क्र. ३०२६/१९९८ (Special Case (ACB) No ८/२०१०) मध्ये मा. न्यायालयाने दि. १४.१२.२०१६ रोजी अंतिम निकाल दिला असून त्यानुसार

सदर प्रकरणी श्री.मिश्रा यांची निर्दोष मुक्तता केली आहे. तसेच संदर्भ क्र. ४ येथील शासन आदेश दि. ३.४.२०१२ अन्वये श्री मिश्रा यांची शिस्तभंग कारवाईअंतर्गत निर्दोष मुक्तता केली आहे.

४. उपरोक्त वस्तुस्थिती पहाता, श्री एस. एस.मिश्रा यांचे निलंबन समर्थनीय ठरत नाही. सबब, श्री.एस.एस.मिश्रा, भावसे यांचा दिनांक दि. ३.८.१९९४ ते दि. ५.९.१९९५ हा निलंबन कालावधी अखिल भारतीय सेवा (शिस्त व अपील ) नियम १९६९ च्या नियम ५(ब)(४) मधील तरतुदीनुसार सर्व प्रयोजनार्थ कर्तव्य कालावधी म्हणून नियमित करुन सदर कालावधीचे १०० टक्के वेतन व भत्ते अनुज्ञेय करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

५. म्हणून आता, शासन अखिल भारतीय सेवा (शिस्त व अपील ) नियम १९६९ च्या नियम ५(ब)(४) मधील तरतुदीनुसार श्री. एस. एस.मिश्रा, भावसे (सेवानिवृत्त) यांचा दिनांक दि. ३.८.१९९४ ते दि. ५.९.१९९५ हा निलंबन कालावधी सर्व प्रयोजनार्थ कर्तव्य कालावधी म्हणून नियमित करुन सदर कालावधीचे १०० टक्के वेतन व भत्ते अनुज्ञेय करण्यास मंजुरी देण्यात येत आहे. तसेच त्यांचे निवृत्ती वेतनार्ह लाभ उक्त कारणांमुळे रोखून ठेवले असतील तर ते त्वरीत मुक्त करण्यात यावेत.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५०३११२८१७९८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2017.05.03 11:29:10 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रति,** श्री एस. एस.मिश्रा, भा.व.से. (सेवानिवृत्त),
(प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या मार्फत)

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री, (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५. अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक),नागपूर
६. महालेखापाल , १ / २- (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
७. सहायक संचालक, भावसे लेखा विभाग, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती/ वैयक्तिक नस्ती